उपजिल्हा रुग्णालय परळी (वै.) जिल्हा बीड येथील येथील मुख्य इमारत दुरुस्ती, अधिकारी/कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती कामाचे अंदाजत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२३/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक : ३० ऑगस्ट, २०२३.

वाचा :- सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ कक्ष- ३/टे-६/ उपजिल्हापरळीदुरुस्तीकामे /८९४९-५०/२३, दि.०३.०८.२०२३.

**प्रस्तावना :-**

उपजिल्हा रुग्णालय परळी (वै.) जिल्हा बीड येथील मुख्य इमारत दुरुस्ती, अधिकारी/कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेबाबत शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे. उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै.) जिल्हा बीड येथील मुख्य इमारत दुरुस्ती, अधिकारी/कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती कामाचे बांधकामाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई यांनी तयार केले असून ते सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित ६ अंदाजपत्रकांचे खालीलप्रमाणे एकूण रु. ५९.९४ लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

उपजिल्हा रुग्णालय,परळी (वै.) जिल्हा बीड येथील मुख्य इमारत दुरुस्ती, अधिकारी/कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती कामाचे रु. ५९.९४ (अक्षरी एकोणसाठ लक्ष चौ-यान्नव हजार फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे विवरण | रक्कम रुपये(लाख) |
|---|---|---|
| १ | उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै) येथील कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती/नूतनीकरण करणे ब्लॉक ए | ९.९९ |
| २ | उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै) येथील कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती/नुतनीकरण करणे वर्ग-२ | ९.९९ |
| ३ | उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै) येथील कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती/नुतनीकरण करणे बॉक-बी | ९.९९ |
| ४ | उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै) येथील इमारत क्र.२ दुरुस्ती/नुतनीकरण करणे | ९.९९ |
| ५ | उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै) येथील इमारत क्र.१ दुरुस्ती/नुतनीकरण करणे | ९.९९ |
| ६ | उपजिल्हा रुग्णालय, परळी (वै) येथील मुख्य इमारत दुरुस्ती/नुतनीकरण करणे | ९.९९ |
|  | एकुण | ५९.९४ |

२. उपरोक्त अंदाजपत्रकास पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्यानिविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. सदर कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच-८, “मुख्य लेखाशिर्ष - ४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,०१,नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय), ११०- रुग्णालये व दवाखाने, (१) (अ)-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती (००) (०१)- मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३ - मोठी बांधकामे” या लेखाशिर्षा खाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३११५३५४२६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.08.31 15:27:16 +05'30'

**अशोक म. आत्राम**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा लातूर मंडळ, लातूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड

७. जिल्हा शल्य चिकित्सक, बीड
८. महालेखापाल,( लेखा व लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
९. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई./निवडनस्ती ( आरोग्य-४ ).